**महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेसाठी "सेवानिवृत्त उप अभियंता" यांची कंत्राटी तत्वावर नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास विभाग

शासन आदेश क्रमांकः मुग्रायो-२०१६/प्र.क्र.१५१(३)/ बांधकाम ४

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

तारीख: ३१ ऑक्टोबर, २०१९

**वाचा -**

१) ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्र. ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दि. २८.१०.२०१५.

२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण २७१५/ प्रक्र १००/१३, दि. ०८.०१.२०१६.

३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. २७१५ /प्र.क्र.१००/१३, दि. १७.१२.२०१६.

४) ग्रामविकास विभाग शासन आदेश क्र. मुग्रायो/२०१६/प्र.क्र १५१ (३)/ पंरा-७, दि. २२.१२.२०१६.

५) ग्रामविकास विभाग शासन आदेश क्र. मुग्रायो/२०१६/प्र.क्र १५१ (३)/ बांध-४, दि. ०५.१२.२०१८.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्यातील न जोडलेल्या वाडया-वस्त्या जोडण्यासाठी व ग्रामीण भागातील दुरावस्था झालेल्या रस्त्यांची दर्जोनती करण्यासाठी राज्यात मुख्यमंत्री ग्रामसडक योजना दि. २८ ऑक्टोबर, २०१५ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी व महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेच्या कामाच्या अंमलबजावणी करीता, सेवानिवृत्त उप अभियंता यांची कंत्राटी स्वरुपात तात्पुरती नेमणुक ११ महिन्याच्या कालावधी करीता, करार पध्दतीने वाचा येथील ५ च्या शासन आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली होती. सदर सेवानिवृत्त उप अभियंता यांची पुढील ११

महिन्यांच्या कालावधीसाठी कंत्राटी स्वरुपात तात्पुरती नेमणुक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**आदेश-**

यापूर्वी विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन वाचा येथील क्र. ५ च्या दिनांक ०५/१२/२०१८ च्या शासन आदेशान्वये दिलेली कंत्राटी तत्वावर नेमणूकीचा कालावधी समाप्त झाल्यानंतर, त्यांच्या नेमणूकी मध्ये खंड देऊन त्यांची कंत्राटी तत्वावरील सेवानिवृत्त उप अभियंता म्हणून त्यांच्या नावापुढे रकाना क्र.४ मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून ११ महिन्यांच्या कालावधीकरीता करार पध्दतीने नेमणूक करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | सेवानिवृत्त उप अभियंत्यांचे नाव | कंत्राटी तत्वावर नेमणुक केलेले कार्यालय | नेमणूकीचा दिनांक |
|---|---|---|---|
| *१* | *२* | *३* | *४* |
| १ | श्री. प्रकाश कोंडीबा पोळ | अधीक्षक अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.ठाणे | ०९/१०/२०१९ |
| २ | श्री. राज किशोर जगताप | अधीक्षक अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.अमरावती | १५/१०/२०१९ |
| ३ | श्री. कन्हैया रतनलाल बजाज | अधीक्षक अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो. नागपूर | ०९/१०/२०१९ |
| ४ | श्री. मनोहर दादुजी गायकवाड | मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.पुणे | ०९/१०/२०१९ |

**२.** सेवानिवृत्त उप अभियंता यांची कंत्राटी पदावरील नियुक्तीच्या कालावधीत कर्तव्ये व जबाबदाऱ्या तसेच अटी व शर्ती वाचा येथील ४ च्या आदेशा मध्ये नमूद केल्याप्रमाणे लागू राहतील.

**३.** सेवानिवृत्त उप अभियंता यांचे मासिक परिश्रमिक व भत्ते सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २७१५ /प्र.क्र.१००/१३, दि. १७/१२/२०१६ मधील तरतूदी प्रमाणे देय राहील.

**४.** या प्रकरणी येणारा खर्च मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००)(०१), मुख्यमंत्री ग्रामीण

मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे (सीआरसी- ५०५४ ५१५३) या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

५. हा शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण २७१५/ प्र.क्र.१००/१३, दि. ०८.०१.२०१६ व संकीर्ण २७१५ /प्र.क्र.१००/१३, दि. १७/१२/२०१६ ला अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१९१०२५११२११९९४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, postalCode=400032, street=MANTRALAYA , MUMBAI, serialNumber=f049989dbbef93340e9edd88af960a0963746d42baa5c948405b62e821529a99, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2019.10.31 12:43:51 +05'30'

**(रा.ना. सवने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद
२) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/( लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई.
३) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)/( लेखापरिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
४) मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव.
५) मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो), पुणे.
६) अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो) म.ग्रा.र.वि.सं., ठाणे, अमरावती व नागपूर.
७) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९) कार्यकारी अभियंता (प्रमंग्रासयो) म.ग्रा.र.वि.सं., ठाणे, अमरावती व नागपूर विभागातील सर्व जिल्हे
१०) राज्य गुणवत्ता समन्वयक, अण्णासाहेब मगर बिल्डिंग, मार्केट यार्ड, गुलटेकडी, गेट नं.२, पुणे-३७.
११) सर्व सेवानिवृत्त उप अभियंता (ई-मेल द्वारे).
१२) कक्ष अधिकारी (आस्थापना १)/ (रोखशाखा), ग्रा.वि.वि., मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती, (कार्यासन बांधकाम-४) ग्रा.वि.वि. बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.